**महिला व बाल विकास विभागांतर्गत बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), गट-ब या पदावर प्रतिनियुक्ती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन आदेश क्र. मबाआ-२०१९/प्र.क्र.२८/का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ११ ऑगस्ट, २०२०.

वाचा:- १) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. मविसे १०/ प्र.क्र.४४/३ (आस्था)-३अ, दि. २८/५/२०१३.
२) महिला व बाल विकास विभाग पत्र क्र. मबाआ-२०१५/प्र.क्र.७/का-७अ,दि.९/४/२०१५.
३) शासन निर्णय,सामान्य प्रशास विभाग,क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६
४) शासन निर्णय, ग्राम विकास विभाग,क्र.संकीर्ण-५०१६/प्र.क्र.३९८/आस्था-८, दिनांक११.१०.२०१८
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली यांचे पत्र क्र.कृषी/ आस्था-१ वशि/१९२/२०१९, दिनांक ११.२.२०१९

**शासन आदेश:-**

महिला बाल विकास विभागांतर्गत गट-ब संवर्गातील बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण) या पदांमध्ये रिक्त पदांचे प्रमाण अधिक असल्याने सदर पदांपैकी सरळसेवेच्या कोटयातील रिक्त पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याच्या अनुषंगाने इच्छुक असलेल्या अधिका-यांचा प्रस्ताव सादर करण्यास संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांना कळविण्यात आले होते. त्यानुसार श्री. राहुल बिरनाळे, कृषी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली ( गट-ब संवर्ग)(वेतनश्रेणी रु. ९३००-३४८०० ग्रेड पे ४४००) यांनी केलेल्या विनंतीनुसार त्यांची महिला व बाल विकास विभागात बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण) या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती होण्याकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली व ग्राम विकास विभागाकडून सहमतीसह प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

२. त्यानुसार श्री. राहुल बिरनाळे, कृषी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली ( गट-ब संवर्ग) यांची महिला व बाल विकास विभागांतर्गत बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण), वाळवा-२ , जि.सांगली (गट-ब संवर्ग) (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८०० ग्रेड पे ४४००) या पदावर **प्रथमत:** दोन वर्ष अथवा सदर पदावर सरळसेवेने अधिकाऱ्याची नियुक्ती होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंतच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

३. श्री.बिरनाळे यांच्या बाल विकास प्रकल्प अधिकारी(ग्रामीण),वाळवा-२, जि.सांगली या पदावरील प्रतिनियुक्तीवरील सेवा खालील अटींच्या अधीन राहतील.

अ) उपरोक्त अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल. त्यानंतर प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर, त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) त्यांनी "मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे" अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

४. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी ग्राम विकास विभाग तसेच महिला व बाल विकास विभाग यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

५. सदरची प्रतिनियुक्ती विनंतीनुसार असल्याने सदर अधिका-यांस प्रतिनियुक्ती भत्ता अनुज्ञेय असणार नाही. तसेच वेतन,भत्ते, रजा,प्रवास सवलत, वैद्यकीय सवलत, गटविमा योजना इ. सेवाविषयक बाबी संदर्भात त्यांना त्यांच्या मूळ सेवेचे नियम लागू असतील.

६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली यांनी श्री.बिरनाळे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे तसेच आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी श्री.बिरनाळे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू करुन घेण्यासंदर्भातील पुढील कार्यवाही तात्काळ करावी.

७. श्री.बिरनाळे यांनी त्यांना प्रतिनियुक्तीने नियुक्ती दिलेल्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचेमार्फत शासनास सादर करावा.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळद्वारे उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००८११२५५५९७७३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA, serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.10.06 16:26:11 +05'30'

**( र. सि. जरांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

१. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली
३. श्री. राहुल बिरनाळे, कृषी अधिकारी ( वाळवा पंचायत समिती), जिल्हा परिषद, सांगली
४. मा.मंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२.
५. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई-३२.
६. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग यांचे स्वीय सहायक, बांधकाम भवन,२५,मर्झबान पथ, मुंबई:-०१
७. सचिव, महिला व बाल विकास विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई-३२
८. सचिव (कृषी ), कृषी व पदुम विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय,मुंबई-३२
९. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
१०. उप सचिव ( जि.प.आस्थापना), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन,२५,मर्झबान पथ,मुंबई:-०१
११. विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे विभाग, पुणे
१२. जिल्हा कार्यक्रम अधिकारी ( म. व बा. वि. ), जिल्हा परिषद, सांगली
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
१४. निवडनस्ती (कार्यासन-७अ), महिला व बाल विकास विभाग.